शासनाच्या ५% व २% स्वेच्छाधिकार कोट्यातून वाटप करण्यात आलेल्या सदनिकांच्या चौकशीसाठी मा.श्री.जे.ए.पाटील यांच्या अध्यक्षतेखाली मा. उच्च न्यायालयाने गठीत केलेल्या एक सदस्यीय समितीच्या कामकाजासाठी मुदतवाढ देणे.....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : याचिका-२०१२/प्र.क्र.४९(भाग-५)/नाजकधा-१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ३० मार्च, २०१५.

वाचा:-

१) फौजदारी जनहित याचिका क्र.२/२०१२ मधील मा.उच्च न्यायालयाचे आदेश दि.८/१०/२०१४ व दि.९/१०/२०१४.
२) समक्रमांक शासन आदेश दि. २९.११.२०१४
३) फौजदारी जनहित याचिका क्र.२/२०१२ मधील मा.उच्च न्यायालयाचे आदेश दि.९/३/२०१५.

**शासन निर्णय:-**

मा. मुख्यमंत्री महोदयांच्या ५ टक्के व २ टक्के स्वेच्छाधिकार कोट्यातील सदनिका वाटपाबाबत याचिकाकर्ते श्री.केतन तिरोडकर यांनी दाखल केलेल्या फौजदारी जनहित याचिका क्र.२/२०१२ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.८/१०/२०१४ व दि.९/१०/२०१४ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार मा.श्री.जे.ए.पाटील, सेवा निवृत्त न्यायमुर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली एक सदस्सीय चौकशी समिती गठीत केलेली असून सदर समितीच्या कामकाजासाठी कार्यालयीन व्यवस्था संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयानुसार करण्यात आली आहे. मा. उच्च न्यायालयाच्या दि. ८ व ९ ऑक्टोबर, २०१४ मधील आदेशानुसार अहवाल सादर करण्यासाठी समितीस दि. ३० एप्रिल, २०१५ पर्यंत कालावधी देण्यात आला होता. परंतु, सदर दिनांकापर्यंत समितीचे कामकाज पूर्ण होऊ शकत नसल्याने मा. उच्च न्यायालयाने दि. ९.३.२०१५ रोजी दिलेले आदेश लक्षात घेऊन समितीस चौकशी अहवाल सादर करण्यासाठी दि. ३१ जुलै, २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. याबाबत संदर्भ क्र. २ मधील शासन निर्णयामध्ये नमुद केलेल्या सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१५१४१३३८२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharam Karbasayya Salimath

Digitally signed by Siddharam Karbasayya Salimath
DN: CN = Siddharam Karbasayya Salimath, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.03.31 13:52:20 +05'30'

**(एस. के. सालीमठ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
६. सचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महासंचालक, माहिती व जन संपर्क महासंचालनालय, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई / अधिदाने व लेखा अधिकारी, मुंबई.
१२.सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१३.उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. (व्यय-४) (वित्तीय सुधारणा).
१४.उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई. (सेवा, का २९-अ).
१५.निवडनस्ती (नाजकधा-१).

प्रत अग्रेषित,

न्या.श्री.जे.ए.पाटील, (सेवा निवृत्त) उच्च न्यायालय, मुंबई,
के-५, स्नेहा पॅराडाइज,
कोथरूड,
पुणे - ४११ ०३८.